नगरविकास विभागांतर्गत ई-प्रकल्प राबविण्यासाठी प्रकल्प अंमलबजावणी समिती (Project Implementation Committee) गठीत करण्याबाबत......

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः नविवि २०२१/प्र.क्र.२७/नवि-२९**
मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ३ ऑगस्ट, २०२३

**वाचा -**

१) सामान्य प्रशासन विभाग,शासन निर्णय, क्र.सीओएम १०९८/प्र.क्र.२१२/९८/३९, दि.०५.१०.२००१.
२) सामान्य प्रशासन विभाग,शासन निर्णय, क्र.सीओएम १००१/प्र.क्र.१७४/०१/३९, दि.२९.१०.२००१.
३) सामान्य प्रशासन विभाग,शासन निर्णय,क्र.डीआयटी/फाईल ०५/१००/३९, दि.२९.१०.२००५.
४) सामान्य प्रशासन विभाग,शासन निर्णय क्र.मातंस २०११/प्र.क्र.१२५/३९, दि.२३.०९.२०११.
५) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. नविवि २०२१/प्र.क्र.२७/नवि-२९,दि.२०.१०.२०२१

**प्रस्तावना:-**

राज्याचे प्रशासन अधिक गतिमान करण्यासाठी तसेच लोकाभिमुख करण्याच्या दृष्टीने राज्याचे ई-प्रशासन धोरण संदर्भाधीन अनु.क्र.४ येथील शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आले आहे. शासकीय विभाग/कार्यालयातील कामकाजाचे संगणकीकरण करण्यासाठी दि.२९.१०.२००१ च्या शासन निर्णयान्वये सर्वसमावेशक कार्यपध्दती विहित करण्यात आली आहे. तसेच सदर शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागाच्या अधिपत्याखालील कार्यालयांतर्गत संगणीकरणाचे प्रकल्प राबविण्याकरीता प्रत्येक प्रशासकीय विभागांतर्गत प्रकल्प अंमलबजावणी समिती गठीत करण्याचे निर्देश देण्यात आले आहेत. त्यानुसार नगरविकास विभागांतर्गत ई-प्रशासन प्रकल्प राबविण्यासाठी प्रधान सचिव (नवि-१) यांच्या अध्यक्षतेखाली प्रकल्प अंमलबजावणी समिती (Project Implementation Committee) समिती स्थापना संदर्भाधीन क्रमांक ५ येथील शासन निर्णयान्वये करण्यात आली होती. मात्र, नगर विकास विभागांतर्गत दोन अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव / सचिव असल्याने व त्याअंतर्गत कामाचे स्वरुप वेगवेगळे असल्याने दोन स्वतंत्र प्रकल्प अंमलबजावणी समित्या स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

(१) सामान्य प्रशासन विभागाने उपरोक्त संदर्भ क्र.१ ते ४ येथे नमूद शासन निर्णयान्वये दिलेल्या मार्गदर्शक सूचना/निर्देश विचारात घेऊन नगरविकास विभागांतर्गत ई-प्रशासन प्रकल्प राबविण्याकरीता अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव (नवि-१) यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे प्रकल्प अंमलबजावणी समिती (Project Implementation Committee) गठीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिका-याचे पदनाम | पद |
|---|---|---|
| १ | अ.मु.स./प्रधान सचिव (नवि-१) नगरविकास विभाग,मंत्रालय,मुंबई | अध्यक्ष |
| २ | संचालक,माहिती तंत्रज्ञान,मंत्रालय,मुंबई | सदस्य |
| ३ | अ.मु.स./प्र.स./सचिव,वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ४ | अ.मु.स./प्र.स./सचिव,नियोजन विभाग,मंत्रालय,मुंबई यांचे प्रतिनिधी | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ५ | अ.मु.स./प्र.स./सचिव,उदयोग,उर्जा व कामगार विभाग,मंत्रालय,मुंबई यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ६ | राज्य सुचना अधिकारी,राष्ट्रीय सुचना केंद्र(NIC),महाराष्ट्र | सदस्य |
| ७ | सह सचिव / उप सचिव (नवि-२९),नगरविकास विभाग,मंत्रालय,मुंबई | सदस्य सचिव |

(२) सामान्य प्रशासन विभागाने उपरोक्त संदर्भ क्र.१ ते ४ येथे नमूद शासन निर्णयान्वये दिलेल्या मार्गदर्शक सूचना/निर्देश विचारात घेऊन नगरविकास विभागांतर्गत ई-प्रशासन प्रकल्प राबविण्याकरीता अ.मु.स./प्रधान सचिव (नवि-२) यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे प्रकल्प अंमलबजावणी समिती (Project Implementation Committee) गठीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिका-याचे पदनाम | पद |
|---|---|---|
| १ | अ.मु.स./प्रधान सचिव (नवि-१) नगरविकास विभाग,मंत्रालय,मुंबई | अध्यक्ष |
| २ | संचालक,माहिती तंत्रज्ञान,मंत्रालय,मुंबई | सदस्य |
| ३ | अ.मु.स./प्र.स./सचिव,वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ४ | अ.मु.स./प्र.स./सचिव,नियोजन विभाग,मंत्रालय,मुंबई यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ५ | अ.मु.स./प्र.स./सचिव,उदयोग,उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ६ | राज्य सुचना अधिकारी,राष्ट्रीय सुचना केंद्र(NIC),महाराष्ट्र | सदस्य |
| ७ | सह सचिव / उप सचिव (नवि-३२),नगरविकास विभाग,मंत्रालय,मुंबई | सदस्य सचिव |

(३) उपरोक्त समितीची कार्यकक्षा सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन शासन निर्णयातील तरतूदींनुसार राहील. सामान्य प्रशासन विभाग (माहिती तंत्रज्ञान) यांनी वेळोवेळी घेतल्या निर्णयानुसार तसेच प्रदान केलेल्या अधिकारानुसार प्रकल्प अंमलबजावणी समितीस अधिकार राहतील.

(४) या समितीस ई-प्रशासन प्रकल्पाची अंमलबजावणी करण्यासाठी आवश्यक ते हार्डवेअर/सॉफ्टवेअर उपलब्ध करण्याकरीता सल्लागार/पुरवठादाराची निवड व इतर अनुषंगीक बाबी याबाबत निर्णय घेण्याचे अधिकार तसेच संदर्भाधीन अनु.क्र.४ येथील दि.२३.०९.२०११ अन्वये निर्गमित केलेल्या शासन निर्णयातील मुद्दा क्र.१२.७ मधील तरतूदीनुसार रु.१० लाखापेक्षा जास्त व रु.५ कोटीपेक्षा कमी खर्चाच्या निविदा प्रकल्पांना मान्यता देण्याचे अधिकार असतील.

(५) प्रकल्प अंमलबजावणी समितीद्वारे मंजूर झालेल्या प्रकल्पास प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि.१७.०४.२०१५ च्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८,मधील भाग पहिला,उप-विभाग तीनच्या अनुक्रमांक चार,परिच्छेद क्र.२७(२)(अ) नुसार राहतील. अशाप्रकारे मान्यता दिलेल्या प्रकल्पांच्या अंमलबजावणीसाठी उपरोक्त संदर्भाधीन अनु.क्र.१ येथे नमूद शासन निर्णयातील अनु.क्र.७.३ मध्ये नमूद केल्याप्रमाणे वित्त विभाग,नियोजन विभाग किंवा माहिती तंत्रज्ञान विभाग यांच्या मान्यतेची आवश्यकता असणार नाही. तसेच ही मान्यता देताना अंमलबजावणी समितीने शासन निर्णय दि.२९.१०.२००१ मधील परि.९ ची अंमलबजावणी काटेकोरपणे होईल याची दक्षता घ्यावी.

(६) ई- प्रशासन प्रकल्पाच्या मंजूरीबाबत समितीमध्ये एकवाक्यता न झाल्यास सदर प्रकल्प माहिती तंत्रज्ञान विभाग शासन निर्णय दि.०५.१०.२००१ अन्वये गठीत केलेल्या उच्चाधिकार समितीकडे मान्यतेस्तव सादर करण्यात यावे.

(७) प्रकल्प अंमलबजावणी समितीने मान्यता दिल्यानंतर संगणकीकरणाची व्यवस्था,हार्डवेअर/सॉफ्टवेअर उपलब्धता, वेब साईट विकसन/देखभाल,इतर माहिती व तंत्रज्ञानविषयक यंत्रसामुग्रीची खरेदी तसेच संगणक प्रणालींचे विकसन (Software Development) बाबतची खरेदी/करार शासनाने विहित केलेल्या पध्दतीने करण्यात यावेत.

(८) सदर समितीच्या आवश्यकतेनुसार बैठका घेण्यात याव्यात.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०८०३१२००५९७६२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHINDE SUBRAO NARAYAN

Digitally signed by SHINDE SUBRAO NARAYAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GOVERNMENT OF MAHARASHTRA, 2.5.4.20=ffa7b5a27faed7560194e6272933cfa60dca1eb8ab54859eae7920c9d0d1f622, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E5BB5862D0E131A274D92F7A1ACEF953E01301C1B0FB615DC6CCE4812BDED257, cn=SHINDE SUBRAO NARAYAN
Date: 2023.08.03 12:03:39 +05'30'

**( सुबराव शिंदे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्य सचिव,मंत्रालय,मुंबई.
२. अपर मुख्य सचिव (वित्त)वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
३. प्रधान सचिव,नियोजन विभाग,मंत्रालय,मुंबई
४. प्रधान सचिव (नवि-१),नगरविकास विभाग,मंत्रालय,मुंबई
५. प्रधान सचिव (नवि-२),नगरविकास विभाग,मंत्रानय,मुंबई
६. प्रधान सचिव,उद्योग,उर्जा व कामगार विभाग,मंत्रालय,मुंबई
७. संचालक,माहिती तंत्रज्ञान,सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई,
८. राज्य सुचना अधिकारी,राष्ट्रीय सुचना केंद्र (NIC),महाराष्ट्र,११ वा मजला,नविन प्रशासन भवन,मुंबई
९. उप सचिव (नवि-२९),नगरविकास विभाग,मंत्रालय,मुंबई
१०. सर्व सह सचिव/उप सचिव,अवर सचिव व कक्ष अधिकारी,नगरविकास विभाग,मंत्रालय,मुंबई
११. निवडनस्ती/नवि-२९.